उच्च व्यावसायिक व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती योजना, सन २०१५-१६ साठी अनुदान वितरण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१५/प्र.क्र.६९/१५/का-६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

तारीख: २९ जुलै, २०१५

वाचा -

1) **शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०११/प्र.क्र.४४/११/का-६, दि. १४.१०.२०११**
2) **शासन परिपत्रक, अल्पसंख्यांक विकास विभाग, क्र.बीयुडी २०१४/प्र.क्र.१४८ (भाग-२)/का-७, दि. १६.०५.२०१५**
3) **शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं - २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३ दि. १७.०४.२०१५**
4) **शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१४/प्र.क्र.०३/१४/का-६, दि. २९.०७.२०१५**

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्याक समाजातील उच्च व्यावसायिक शिक्षण घेणाऱ्या व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांकमध्ये शिक्षण घेत असलेल्या आर्थिक दृष्टया कमकुवत व गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजने अंतर्गत सन २०१५-१६ मध्ये करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून रु. ३९.२० कोटी इतका निधी अंमलबजावणी यंत्रणेला वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सदर योजनेसाठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता " मागणी क्र. झेड ई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहाय्यक अनुदान (२२३५-ए-३३८) ३१ सहायक अनुदान" या लेखाशीर्षाखाली संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकान्वये रु.३९.२० कोटी एवढे लेखानुदान मंजूर करण्यात आले आहे. सदर लेखाशिर्षाखाली सन २०१५ -१६ या आर्थिक वर्षातील एप्रिल, व नोंव्हेंबर, २०१५ या पहिल्या ८ महिन्यांसाठी पुढीलप्रमाणे लेखानुदान मंजूर करण्यात येत आहे.

(रुपये हजारात)

| अ.क्र. | तपशिलवार शीर्ष | सन २०१५-१६ साठी अर्थसंकल्पित अनुदान | वितरित करावयाचे लेखानुदान | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | एप्रिल | मे | जून | जुलै | ऑगस्ट | सप्टेंबर | ऑक्टोबर | नोव्हेंबर |
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७. | ८. | ९. | १०. | ११. |
| १ | ३१, सहायक अनुदान | ५६,००,००/- | ०० | ०० | ०० | ०० | ३९,२०,०० | ०० | ०० | ०० |

२. सदर योजनेंतर्गत सन २०१५-१६ या वर्षातील एप्रिल व नोव्हेंबर, या पहिल्या ८ महिन्यातील अंमलबजावणीसाठी वरील विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे एकूण रु. ३९.२० कोटी (रुपये एकोण चाळीस कोटी वीस लाख फक्त) इतके लेखानुदानपैकी संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांना रू.३४ कोटी(रू.चौतीस कोटी) व संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, मुंबई यांना रू. ५.२० कोटी (रू. पाच कोटी वीस लाख) वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सन २०१५-१६ या वर्षातील शिष्यवृत्ती योजनेच्या अंमलबजावणीसाठी सदर रक्कम त्यांच्या स्वाधीन करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई व संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, मुंबई यांनी सन २०१५-१६ च्या मासिक निधीत विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे विहित मयादेपर्यंतच खर्च करावा. सदर निधीतून नूतनीकरणासाठी अर्ज केलेल्या विद्यार्थ्यांना प्राथम्याने दि.३१/१०/२०१५ पूर्वी शिष्यवृत्तीचे वाटप करण्यात यावे.उपरोल्लेखित लेखानुदानाच्या खर्चाचा तपशिल व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास विहित कालावधीत सादर करावे. तसेच हे अनुदान खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पिय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकारी नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वेळोवेळी शासनाने या अनुषंगाने दिलेले सर्व निदेश/नियम/शासन निर्णय/आदेश आणि केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना व नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या निरीक्षणाने पालन करण्यात यावे. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१ वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम,

दि. १५.०५.२००९ , अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत/विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियमपुसितका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं - २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३ दि. १७.०४.२०१५ व शासन परिपत्रक, अल्पसंख्यांक विकास विभाग, क्र.बीयुडी २०१४/प्र.क्र.१४८ (भाग-२)/का-७, दि. १६.०५.२०१५ अन्वये आणि अपर मुख्य सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग यांनी प्रशासनिक विभाग प्रमुख या नात्याने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४.सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च " मागणी क्र. झेड ई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहाय्यक अनुदान (२२३५-ए-३३८) ३१ सहायक अनुदान या लेखाशीर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०७२९१६५४३८६०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ainul C Attar

Digitally signed by Ainul C Attar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ainul C Attar
Date: 2015.07.30 11:54:33 +05'30'

(अैनुल अत्तार)

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, अल्पसंख्याक विकास यांचे खाजगी सचिव,
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

८. अपर मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव ,अल्पसंख्याक विकास विभाग,मंत्रालय,मुबई.
१०.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.संचालक, उच्च शिक्षण , उच्च शिक्षण संचालनालय, पुणे.
१२.संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
१३.संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, मुंबई
१४.निवड नस्ती (कार्यासन-६)